**शालेय शिक्षण व क्रीडा विभागात ईगव्हर्नन्स प्रकल्पाअंतर्गत E & Y कंपनीचे सल्लागार सेवा शुल्क अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ईगव्ह-१५१८/प्र.क्र.३५ /संगणक**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तारी इमारत, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक:- ८ ऑगस्ट, २०१८

वाचा :-

१) **शासन निर्णय सामान्य प्रशासन विभाग क्र.मातसं-०८०/४/२०१/-०/० माहिती व तंत्रज्ञान संचालनालय- DIT (MH), दि.०१ जूलै, २०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-१५१८/प्र.क्र.२३/संगणक, दि. २८ मार्च, २०१८**
३) **आयुक्त, (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आशि/२०१८/ई-गव्हर्नस/ई ॲन्ड वाय/ आस्था क १४३/३६२८, दि.२५.०६.२०१८.**

प्रस्तावना :-

संदर्भाधिन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र शासनाने ई-प्रशासन धोरणांतर्गत तज्ञ सल्लागार नियुक्त करण्याबाबतची कार्यपध्दती तसेच देय शुल्काचे दर निश्चित करण्यात आले आहेत. त्याअनुषंगाने शालेय शिक्षण व क्रीडा विभागाने ई-गव्हर्नन्स या योजनेसाठी E & Y कंपनीची निवड केली. सदर कंपनीने ई- गर्व्हर्नन्सचे काम पाहण्यासाठी ५ पूर्ण वेळ व १ अर्धवेळ सल्लागाराची नियुक्ती केली. आयुक्त (शिक्षण ) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी E & Y कंपनीच्या संल्लागाराचे १ नोव्हेंबर, २०१७ ते ३१ मार्च, २०१८ कालावधीसाठी सल्ला सेवा शुल्कापोटी रुपये ७१,८०,१०४/- एवढा निधी आवश्यक असल्याचे संदर्भाधीन क्र.४ वरील पत्रान्वये प्रस्तावित केले आह. त्या अनुषंगाने विभागात नियुक्त केलेल्या E & Y कंपनीस संल्लागार सेवा शुल्कापोटी निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. शालेय शिक्षण विभाग (खुद्द) तसेच विभागाच्या अखत्यारितील विविध कार्यालयांमध्ये ई-गव्हर्नस प्रकल्पांतर्गत खालील सल्लागारांची नियुक्ती करण्यात आली आहे. तसेच सल्लागारांचे सल्लागार सेवा शुल्काच्या पाच महिन्यांच्या देयकाचा तपशिलही खालील तक्त्यात देण्यात आला आहे.

| अ.क्र. | सल्लागाराचे नांव | कामाचे स्वरुप | कार्यालय |
|---|---|---|---|
| १. | श्री.शशिकांत शुक्ला | अर्ध वेळ मुख्य सल्लागार | शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय |
| २. | श्री.ओवेस शेख | पूर्ण वेळ सल्लागार | शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय |
| ३. | श्री.राकेश नागपूर | पूर्ण वेळ सल्लागार | शिक्षण आयुक्तालय, पुणे |
| ४. | श्री.अभिषेक सावरीकर | पूर्ण वेळ सल्लागार | शिक्षण आयुक्तालय, पुणे |
| ५. | श्री.शशांक दिक्षित | पूर्ण वेळ सल्लागार | शिक्षण आयुक्तालय, पुणे (दि.१३.११.२०१७ पासून) |
| ६. | श्रीमती.सुगंधा दास | पूर्ण वेळ सल्लागार | क्रीडा आयुक्तालय, पुणे |

| **अ.क्र.** | **सल्ला सेवा शुल्क देयकाचा कालावधी** | **एकूण रक्कम (करांसहीत)** |
|---|---|---|
| **१** | **१ नोव्हेंबर, २०१७ ते ३१ मार्च, २०१८** | **रु.७१,८०,१०४/-** |
| **एकूण** | | **रु.७१,८०,१०४/-** |

२. उपरोक्त नियुक्त सल्लागारांच्या नियुक्तीबाबतच्या तपशीलाबाबत आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खात्री करावी. त्यानुसार सल्ला सेवा शुल्क संदर्भाधिन क्र.१ वरील शासन निर्णयान्वये विहित केल्यानुसार तसेच कार्यादेशात नमूद अटी व शर्तीनुसार अदा करण्यास आणि आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार E & Y कंपनीच्या सल्लागारांच्या सेवांसाठी रुपये ७१,८०,१०४/-एवढा निधी वितरित करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

३. सदरचा खर्च मागणी क्रमांक. ई-२, २२०२ सर्वसाधारण शिक्षण,८० पंचवार्षिक योजनांतर्गत योजना (०२) (५१) ई-गव्हर्नन्स कार्यक्रम ( २२०२ H ४५४ ) ३१ सहायक अनुदाने या लेखाशिर्षातून सन २०१८-१९ च्या उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा. यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रक व शिक्षण संचालक, (माध्य.व उच्च माध्य.) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८०८१६२३३५६७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pravin Rajaram Mundhe

Digitally signed by Pravin Rajaram Mundhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8cc298cb2ba38f035e6bd1a51789c7ed1ed4f4fce865eda3495969f77d97c89a, cn=Pravin Rajaram Mundhe
Date: 2018.08.08 16:29:42 +05'30'

**( प्रविण मुंढे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा.अ.मु.स. वित्त विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
२) माअ.मु.स. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्विय सहायक मंत्रालय.
३) मा.प्र.स., माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे
६) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर १/२.
८) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
९) निवडनस्ती/संगणक